**अनु.जाती व नवबौध्द मुला-मुलींकरिता निवासी शाळेत इ. ५ वी ते ७ वी चे वर्गात प्रवेशाकरिता मार्गदर्शकतत्वे.**

**महाराष्ट्र शासन**

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग

शासन निर्णय, क्रमांक-बीसीएच २०११/प्र.क्र.२११/मावक-४,

मंत्रालय, मुंबई-३२.

दिनांक - २९ जून, २०११

**वाचा -** १) सामाजिक न्याय सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्रमांक-अजाशा २००५/प्र.क्र.४३२/मावक-४, दिनांक १ जून, २००६

२) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय,क्रमांक-बीसीएच-२०११ /प्र.क्र.१४०/मावक-४, दिनांक १३ एप्रिल, २०११.

३) डॉ. आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांचे जावक क्रमांक साविन्याबै/प्राध्या/११-१२/४६४, दि.९/५/२०११ चे पत्र

**प्रस्तावना** - महाराष्ट्रातील अनुसूचित जातीमधील बहुतांश व्यक्ती हया शेतमजूर किंवा लहान सिमांकित शेतकरी असल्याने त्यांची आर्थिक परिस्थिती लक्षात घेता त्यांना त्यांच्या मुलांना शाळेत पाठवून त्यांचा शैक्षणिक विकास घडवून आणणे अत्यंत कठिण जाते. ही परिस्थिती लक्षात घेवून त्यांच्याकरिता सन १९९६-९७ पासून आश्रमशाळा ही योजना कार्यान्वित आहे. या योजनेअंतर्गत राज्यामध्ये आतापर्यंत १० प्राथमिक व १ माध्यमिक अशा स्वयंसेवी संस्थांच्या एकूण ११ आश्रमशाळा कार्यान्वित आहेत. या आश्रमशाळा अपुऱ्या असल्याने राज्य शासनाच्या सन २००३-०४ च्या अर्थसंकल्पामध्ये प्रत्येक तालुक्यामध्ये एक याप्रमाणे एकूण ३५३ निवासी शाळा सुरु करण्याचे घोषित करण्यात आले होते. तसेच अनुसूचित जाती व नवबौध्दांच्या मुलामुलींकरिता इ. १ ते ७ वी च्या विद्यार्थ्यांकरिता मुंबई शहर व उपनगर हे दोन जिल्हे वगळता सुरुवातीस सन २००७-०८ या शैक्षणिक वर्षापासून १०० शासकीय निवासी शाळा शासनाच्या वतीने सुरु करण्यास शासन निर्णय, क्रमांक-अजाशा-२००५ /प्र.क्र.४३२ /मावक-४, दिनांक १.६.२००६ अन्वये मान्यता देण्यात आली आहे. तसेच शासनामार्फत प्रत्येक तालुक्याच्या ठिकाणी सुरु करावयाच्या १०० निवासी शाळांची ठिकाणे मा. मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील समितीने निश्चित केलेली आहेत. तालुक्याच्या ठिकाणी सुरु करावयाच्या अनुसूचित जाती व नवबौध्दांच्या मुलांमुलीच्या शासकीय निवासी शाळेची ठिकाणे अनुसूचित जाती व नवबौध्दांची संख्या, साक्षरतेचे प्रमाण आणि आवश्यकता विचारात घेवून निश्चित करण्यात आलेली आहे.

शासनाच्या धोरणात्मक निर्णयानुसार वरील ठिकाणांपैकी ज्या ठिकाणी इमारतींचे बांधकाम पूर्ण झालेले आहे त्या ठिकाणी जून २०११ पासून इ. ५ वी ते ७ वी चे वर्ग सुरु करण्याचा निर्णय

शासनाने घेतला आहे. सदर वर्गामध्ये मागासवर्गीय मुला-मुलींना प्रवेशांकरिता सविस्तर मार्गदर्शकतत्वे नवोदय विद्यालयाच्या धर्तीवर तयार करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते. बालकांना मोफत व सक्तीचे शिक्षण देणारा अधिनियम २००९ पासून संपूर्ण भारतभर (जम्मू काश्मीर वगळून) अंमलात आलेला आहे. त्यामुळे नवोदय विद्यालयाने प्रवेश परीक्षा घेण्याचे स्थगित केले आहे. ही बाब लक्षात घेता शासकीय निवासी शाळेत मागासवर्गीय मुला-मुलींना प्रवेशाकरिता आवश्यक असणारे मार्गदर्शक तत्वे पुढीलप्रमाणे रहातील.

**<u>शासन निर्णय -</u>** अनुसूचित जाती व नवबौध्दांच्या मुला-मुलींसाठी प्रत्येक तालुक्याच्या ठिकाणी शासकीय निवासी शाळा सुरु करण्यास मान्यता देण्यात आली असून अनुसूचित जाती व नवबौध्दांच्या मुला-मुलींकरिता जून २०११ पासून इयत्ता १ ली ते ७ वी च्या वर्गात प्रवेशाकरिता खालील मार्गदर्शक तत्वास मान्यता देण्यात येत आहे.

१) जून २०११ पासून शासनामार्फत चालविण्यात येणाऱ्या निवासी शाळांमध्ये इ. ५ वी ते ७ वी चे वर्ग सुरु करण्यात येतील. इ. ५ वी ते ७ वी च्या प्रत्येक वर्गामध्ये उपलब्ध असल्यास ८० विद्यार्थ्यांना प्रवेश देण्यात येईल. जर पुरेशी जागा उपलब्ध झाली नाही तर विद्यार्थी प्रवेश संख्या ८० वरुन ४० पर्यंत कमी करण्यात यावी.

२) सन २०१२-१३ या शैक्षणिक वर्षापासून इयत्ता ८ वी व त्यानंतर नैसर्गिक वर्ग वाढीनुसार ९ वी १० वी चे वर्ग सुरु करण्यात येतील व त्यानंतर दरवर्षी इयत्ता ५ वीच्या वर्गापासून निवासी शाळा सुरु करण्यात येईल. शासकीय निवासी शाळेत प्रवेश देताना बालकांना मोफत व सक्तीचे शिक्षण देणारा अधिनियम २००९ मधील तरतूदीनुसार लॉटरी पध्दतीचा अवलंब करण्यात यावा.

३) ज्या जिल्हयामध्ये /तालुक्यामध्ये निवासी शाळा आहे, त्याच जिल्हयामधील / तालुक्यामधील मुला-मुलींना प्रवेशासाठी पात्र ठरविले जाईल. त्या त्या प्रवर्गातील विद्यार्थी प्रवेशासाठी उपलब्ध न झाल्यास इतर जिल्हयातील त्याच प्रवर्गातील विद्यार्थी प्रवेश घेण्यास इच्छुक असल्यास त्यांना प्रवेश देण्यात यावा.

अपवादात्मक परिस्थितीत शासनामार्फत चालविण्यात येणाऱ्या इतर जिल्हयातील शासकीय निवासी शाळेमधील मुला-मुलींना बदलीने प्रवेश देण्यात यावा.

४) अनुसूचित जातीच्या मुला-मुलींच्या शासकीय निवासी शाळांसाठी प्रवेश प्रत्येक शैक्षणिक वर्षामध्ये प्रवेशासाठी अर्ज करण्याची अंतिम मुदत ३० सप्टेंबर पर्यंत राहील.

५) निवासी शाळेत प्रवेश घेण्यासाठी विहीत केलेले अर्ज खालील अधिकाऱ्यांकडे विनामूल्य मिळतील -

१) गट शिक्षण अधिकारी, पंचायत समिती
२) जिल्हा समाजकल्याण अधिकारी
३) शिक्षण अधिकारी ( माध्यमिक) जिल्हा परिषद
४) राष्ट्रीय मुक्त शिक्षण संस्थांमध्ये, सर्व शिक्षा अभियान मुख्याध्यापकाकडे
५) प्राचार्य /मुख्यध्यापक अनुसूचित जातीच्या मुला-मुलींची निवासी शाळा

६) निवासी शाळेत  प्रवेश घेताना खालील कागदपत्रे आवश्यक आहेत.

१) शाळा सोडल्याचा दाखला. (आवश्यक असल्यास)

२) विद्यार्थ्यांस सक्षम प्राधिकाऱ्याने दिलेले जातीचे प्रमाणपत्र

३) महाराष्ट्रात रहिवासी असल्याचे सक्षम प्राधिकाऱ्याचे प्रमाणपत्र

४) अपंग असल्यास सक्षम प्राधिकाऱ्याने दिलेले अपंगाचे प्रमाणपत्र

५) बालकांना मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिनियम २००९ मधील कलम ४ अनुसार वय वर्षे ६ ते १४ गटातील बालकांना त्यांच्या वयानुरुप त्या त्या वर्गात  प्रवेश देण्यात यावा. बालक अगोदर शाळेत गेले नसले तरी वयानुरुप वर्गात  प्रवेश देण्यात यावा. (म्हणजे ११ वर्षे वयाची बालके  इ. ६ वी त प्रवेशास पात्र याप्रमाणे )

६) विद्यार्थी  ज्या निवासी शाळेमध्ये प्रवेश घेवू इच्छित असेल त्या जिल्हयातील असावा.  तथापि सदर जिल्हयातील विद्यार्थ्यांची संख्या कमी भरल्यास इतर जिल्हयातील त्याच प्रवर्गातील विद्यार्थ्यांचा विचार  करावा.
परंतु कोणत्याही परिस्थितीत वयाचा पुरावा नाही म्हणून प्रवेश नाकारता येणार नाही.

७) शासकीय निवासी शाळेमध्ये प्रवेशाकरिता खालीलप्रमाणे आरक्षण राहील. खाली नमुद केल्याप्रमाणे आरक्षण ठेवण्यात यावे.

१) अनुसूचित जाती    - ८०%

२) अनुसूचित जमाती - १०%

३) अपंग प्रवर्ग  -   ३%

४) विमुक्त जाती / भटक्या जमाती -   ५%

५) विशेष मागास प्रवर्ग -    २%

अ) शासकीय निवासी शाळेतील प्रवेशासाठी मागासवर्गीयांच्या निरनिराळ्या प्रवर्गासाठी निश्चित केलेल्या टक्केवारीमध्ये अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, विमुक्त जाती /भटक्या जमाती, इत्यादीतील सैनिकांच्या मुलांना व मुलींना आणि इतर अवलंबितांना व तसेच बाल कामगारांना अधिक पसंती देण्यात यावी.

ब) अनुसूचित जातीसाठी राखून ठेवलेल्या जागांपैकी महापालिका क्षेत्रात व अ-वर्ग नगरपालिका क्षेत्रात १४% जागा मांग व मेहतर जातीसाठी (मांग जातीसाठी ७% व मेहतर जातीसाठी ७%) आणि जिल्हा व तालुका पातळीवर मांग व मेहतर जातीसाठी १०% जागा (मांग जातीसाठी ५%  मेहतर जातीसाठी ५%) राखीव ठेवण्यात याव्यात.

८) शासकीय  निवासी शाळेमध्ये इ. ५ वी ते ७ वीमध्ये शिक्षण घेण्याऱ्या मुलामुलींकरिता गणित व विज्ञान हे विषय इंग्रजी भाषेतून व सामाजिक शास्त्र हा विषय मराठी भाषेतून शिकविण्यात यावा.

हा शासन निर्णय शालेय शिक्षण विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक सांकेतांक २०११०६२९१६२७०८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( दिनेश वाघमारे )**
**सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

मा. मंत्री, सामाजिक न्याय यांचे खाजगी सचिव
मा. राज्यमंत्री, सामाजिक न्याय यांचे खाजगी सचिव
मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक
मा. सचिव यांचे स्वीय सहायक
संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
सर्व विभागीय समाज कल्याण अधिकारी,
शिक्षण संचालक, माध्यमिक, महाराष्ट्र राज्य, पुणे
सर्व विशेष जिल्हा समाज कल्याण अधिकारी,
सर्व समाज कल्याण अधिकारी, गट-अ, जिल्हा परिषद
गट शिक्षण अधिकारी,
सर्व शिक्षण अधिकारी, जिल्हा परिषद,
शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
महासंचालक, डॉ.आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
संगणक कक्ष सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय
निवड नस्ती

--------------